**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०११-२०१२**
२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम
१९८ - ग्रामपंचायतींना सहाय्य
(००) (०२) पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थांना अनुदान
(२५१५ १६७७) (योजनातंर्गत / दत्तमत्त)
३१ - सहाय्यक अनुदाने (मागणी क्रमांक- एल ३)
**पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेअंतर्गत प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन यासाठी वितरीत करावयाचा निधी**

**महाराष्ट्र शासन,**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. व्हीपीएम २०११/प्र.क्र. १२१ /पंरा-४(२२)
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक- २१ जुलै, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.व्हीपीएम २६१०/प्र.क्र.१/पं.रा.-४ दि. १८ ऑगस्ट,२०१०
२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. व्हीपीएम २०११/प्र.क्र.१२१/पं.रा.-४ दि.१९ जुलै,२०११

**प्रस्तावना :-**

राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षाच्या निमित्ताने राज्यातील गावांचा शाश्वत विकास घडवून आणण्याकरीता व गावात उच्च प्रतिच्या भौतिक सुविधांची निर्मिती करतानाच नैसर्गिक साधन संपत्तीचा विनियोग पर्यावरणाचे संतुलन केंद्रस्थानी ठेवून करणे व त्याअंतर्गत ग्रामपंचायतींना रोपवाटिका व वृक्षसंवर्धन, गावातील सांडपाण्याचे व्यवस्थापन, जलनि:स्सारण गटारे, रस्त्यावरील दिवाबत्ती- सौर पथदिवे, अपारंपारिक उर्जा विकास व वापर, दहन-दफन भूमी बांधकाम व त्यासाठी आवश्यक इतर सोईसुविधा पुरविणे, स्मृती उद्याने, राजीव गांधी भारत निर्माण सुविधा केंद्र इत्यादीकरीता निधी जिल्हा स्तरावरुन ग्रामपंचायतींना उपलब्ध करून देण्यासंदर्भात शासनाने पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजना राबविण्यसाठी दिनांक १८ ऑगस्ट,२०१० रोजी शासन निर्णय पारित केलेला आहे. सदर शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक १२ (३) च्या तरतूदीनुसार जनजागृतीसाठी या योजनेच्या एकूण अर्थसंकल्पित शासन सहभाग निधीच्या २ टक्के निधी प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन यासाठी राज्यस्तरावरून तरतूद उपलब्ध करण्यात आलेली आहे. पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेसंदर्भात ग्रामपंचायतींच्या प्रतिनिधीचे उद्‌बोधन, प्रशिक्षण व पर्यावरण जनजागृती, प्रचार प्रसिध्दी, योजनेविषयी माहिती देणारे रथयात्रा, योजनेविषयक कार्यशाळा, स्पर्धा, प्रदर्शन यासाठीचा निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांचे अधिनस्त ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

२. सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात पर्यावरणर संतुलित समृध्द ग्राम योजनेकरीता रुपये १५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध झालेली आहे. त्यानुसार शासन निर्णय दिनांक १९ जुलै,२०११ अन्वये रुपये १४७.०० कोटी इतका निधी पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेत पात्र ग्रामपचांयतींना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत वितरीत करण्यात आला आहे. महाराष्ट्र शासन, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम २६१० / प्र.क्र.१ / पं.रा.४ दिनांक १८ ऑगस्ट, २०१० मधील मुद्या क्रमांक १२ (३) च्या तरतूदीनुसार जनजागृतीसाठी या योजनेच्या एकूण अर्थसंकल्पित शासन सहभाग निधीच्या २ टक्के निधी प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन यासाठी राज्यस्तरावरून तरतूद उपलब्ध करण्यात आलेली आहे. प्राप्त निधीच्या २ टक्के म्हणजे जवळपास रुपये ३.०० कोटी इतका निधी प्रसिध्दी प्रचारासाठी उपलब्ध होत आहे. पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेसंदर्भात ग्रामपंचायतींच्या प्रतिनिधीचे उद्‌बोधन, प्रशिक्षण व पर्यावरण जनजागृती, प्रचार प्रसिध्दी, योजनेविषयी माहिती देणारे रथयात्रा, योजनेविषयक कार्यशाळा, स्पर्धा, प्रदर्शन, प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन यासाठी रुपये ३.०० कोटी इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांचे अधिनस्त ठेवण्यात येत आहे. या निधीबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदरहू निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी पुढील आदेश होईपर्यंत त्यांचे नियंत्रणाखाली ठेवावे. पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेसाठी वेळोवेळी होणाऱ्या प्रचार प्रसिध्दी व व्यवस्थापन यासाठी लागणारा निधी मुख्य कार्यकारी अधिकरी, जिल्हा परिषद, ठाणे यांचेमार्फत वितरीत करण्यात येईल.

३. नियंत्रक अधिकाऱ्यांनी या योजनेकरीता झालेल्या / होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाएवढा खर्च "२५१५" - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८ - ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०२) पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेच्या अंमलबजावणीसाठी पंचायत राज संस्थांना अनुदान (२५१५ १६७७) (योजनातंर्गत / दत्तमत्त) ३१ - सहाय्यक अनुदाने (मागणी क्रमांक- एल ३) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा, व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र ५८२/अर्थ -१७ दिनांक १६/७/२०११ अन्वये अर्थसकल्पीय वितरण प्रणालीवर (Budget Distribution System ) या विभागास उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०११०७२११५५७४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( डॉ.मल्लीनाथ कलशेट्टी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई -४०० ००१ वर नमूद केल्याप्रमाणे तीन प्रतीत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी.( ३ प्रती )

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ००१
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२ , नागपूर .
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
४)अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य (अराप/रालेवि-१), मुंबई.
५) विभागीय आयुक्त (सर्व )
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे
९) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत ), जिल्हा परिषद, ठाणे
१०) कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारणविभाग (वित्त -१, वित्त- ७, वित्त -८)
११) कक्ष अधिकारी (रोखशाखा) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई.३२.
१२) वित्त विभाग (अर्थसंकल्प १७ / व्यय१५)मंत्रालय, मुंबई.३२.
१३) निवडनस्ती ,पंरा -४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग.